**सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी/जवान यांच्या विधवा/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी व जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत - शहीद जवान नितीन शिवाजी राठोड जि. बुलढाणा.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०१९/ प्र. क्र. ६३/२८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०२/०३/२०२०.

**वाचा**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१७/(प्र.क्र.३१०)/२०१७/२८, दिनांक २७/०३/२०१८
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/(प्र.क्र.६८)/२०१९/२८, दिनांक ०२/०८/२०१९
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/प्र.क्र.६३/२८, दिनांक १६/०२/२०१९
४) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०२५/सैकवि-१६/२९१४, दिनांक ३०/१०/२०१९

**प्रस्तावना**

युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये, तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत / देशाबाहेरील मोहिमेत धारातीर्थी पडलेल्या राज्यातील सैनिकांच्या वारसांना /अपंगत्व आलेल्या सैनिकांना/तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्कर दलातील सदस्य/त्यांच्या कुटुंबियांना संदर्भाधिन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१७/(प्र.क्र.३१०)/२०१७/२८, दिनांक २७/०३/२०१८ अन्वये रू. २५.०० लाख इतकी आर्थिक मदत देण्याची तरतूद करण्यात आली आहे. तथापी त्यानुसार पुलवामा येथे सीआरपीएफच्या ताफ्यावर झालेल्या दहशतवादी हल्ल्यात धारातीर्थी पडलेल्या कॉंस्टेबल नितीन शिवाजी राठोड या जवानास **विशेष बाब** म्हणून शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/प्र.क्र.६३/२८,दिनांक १६/०२/२०१९ अन्वये **रू. ५०.०० लाख आर्थिक मदत देण्यात आली आहे**.दरम्यान संदर्भ क्र. १ अन्वये देण्यात येणारी आर्थिक मदत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,

क्र.मासैम २०१९/(प्र.क्र.६८)/२०१९/२८,दिनांक ०२/०८/२०१९ अन्वये रू. १.०० कोटी इतकी करण्यात आली असून सदर शासन निर्णय दि. १ जानेवारी २०१९ पासून पूर्वलक्षी प्रभावाने लागू करण्यात आला आहे. सबब कॉंस्टेबल नितीन शिवाजी राठोड या जवानास उर्वरीत फरकाची रक्कम रू. ५०.०० लाख आर्थिक मदत अदा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय**

दि. २७/०३/२०१८ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार द्यावयाच्या आर्थिक मदतीपैकी २०% रक्कम शासकीय अनुदानातून व उर्वरित ८०% रक्कम मुख्यमंत्री सहायता (कारगील) निधीतून देण्यात येते.त्यानुसार कॉंस्टेबल नितीन शिवाजी राठोड या धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या कुटुंबियांना रू. ५०.०० लाख इतकी रक्कम (रू. १०.०० लाख इतकी रक्कम शासकीय अनुदानातून तर रू. ४०.०० लाख इतकी रक्कम मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून) अदा करण्यात आली आहे.

आता दि. २/०८/२०१९ च्या शासन निर्णयानुसार द्यावयाच्या आर्थिक मदतीपैकी ५०% रक्कम शासकीय अनुदानातून व उर्वरित ५०% रक्कम मुख्यमंत्री सहायता (कारगील) निधीतून देण्यात येते.त्यानुसार मुख्यमंत्री सहायता (कारगील) निधीतून देण्यात येणारी रक्कम खालील प्रमाणे कॉंस्टेबल नितीन शिवाजी राठोड या धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या कुटुंबियांना देय आहे.

| नाव व पत्ता | मृत्यु दिनांक, मोहिम व ठिकाण | वारसाचे नांव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|
| नं. ०५५२११७८५ कॉंस्टेबल **नितीन शिवाजी राठोड,** मु. चोरपांगरा, पो. बिबी, ता. लोणार, जि. बुलढाणा | १४ फेब्रुवारी २०१९ जम्मू-काश्मिर पुलवामा | १.श्रीम. वंदना नितीन राठोड ( वीरपत्नी) रु. ६.०० लाख<br>२.श्रीम. सावित्रीबाई शिवाजी राठोड (वीरमाता)रु.२.०० लाख<br>३.श्री. शिवाजी रामू राठोड (वीरपिता) रु. २.०० लाख<br>मु. चोरपांगरा, पो. बिबी, ता. लोणार, जि. बुलढाणा |
| | **एकूण** | **रुपये १०.०० /- लाख** |

२. त्यानुसार, धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या कुटुंबियांना एकूण अनुज्ञेय फरकाच्या (रू. ५०.०० लाख) रक्कमेपैकी रु.१०,००,०००/-( रु. दहा लाख फक्त) इतकी रक्कम मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. उर्वरीत शासन अनुदानातून द्यावयाच्या फरकाची रक्कम रु.४०,००,०००/- (रुपये चाळीस लाख फक्त) अदा करण्याबाबत स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, बुलढाणा यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना द्यावयाची आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/(प्र.क्र.६८) /२०१९/२८, दिनांक ०२/०८/२०१९ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०२१८०९४९७१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Mahadeo Khade

Digitally signed by Suresh Mahadeo Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=14c299447f4a6e6c33ab3f7a85fbf010628981e82f8311a81d1cf974681485c2, serialNumber=f0b4c833a6fc7c6fb7cb0a96a3e2bb79d42d283b8f0f7bfc1ae95298d60bacf1, cn=Suresh Mahadeo Khade
Date: 2020.03.03 11:51:00 +05'30'

**(सुरेश खाडे)**
**उप सचिव महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, बुलढाणा,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, बुलढाणा,
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,
१०. श्रीम. वंदना नितीन राठोड ( वीरपत्नी), मु. चोरपांगरा, पो. बिबी, ता. लोणार, जि. बुलढाणा
११. श्रीम. सावित्रीबाई शिवाजी राठोड (वीरमाता) मु. चोरपांगरा, पो. बिबी, ता. लोणार, जि. बुलढाणा
१२. श्री. शिवाजी रामू राठोड (वीरपिता) मु. चोरपांगरा, पो. बिबी, ता. लोणार, जि. बुलढाणा
१३. निवडनस्ती (२ प्रती).